घरबांधणी अग्रीम नियम –
जुने घर विकत घेण्यासाठी अग्रीम.

**महाराष्ट्र शासन,**
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक. घबांअ–1095/प्र.क्र.54/95/विनियम,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 10 जुलै 1995.

वाचा:– वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक घबांअ–1087/(465)/विनियम, दिनांक 6 नोव्हेंबर, 1990.

निर्णय:– शासन निर्णय, दिनांक 6.11.1990 अन्वये शासकीय कर्मचा–यांना जुने घर/फ्लॅट/जुना बंगला खरेदी करण्यासाठी घरबांधणी अग्रीम अनुज्ञेय ठरविण्यात आलेला आहे. परंतु त्याची रक्कम कर्मचारी/अधिकारी याला अनुज्ञेय असलेल्या अग्रीमाच्या 50% इतकी सीमित करण्यात आलेली आहे. नवीन घरांच्या किंमतीत वाढत्या महागाईमुळे वाढ झाल्याने जुन्या घरांच्या किंमतीतही पर्यायाने बरीच वाढ झालेली आहे. त्यामुळे जुन्या घरासाठी विद्यमान नियमानुसार अनुज्ञेय असलेल्या घरबांधणी अग्रिमाच्या मर्यादेत वाढ करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने आता या विभागाच्या उपरोल्लेखित शासन निर्णय, दिनांक 6 नोव्हेंबर 1990 च्या परिच्छेद (अ)(1) मध्ये अंशत: बदल करून पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :–

राज्य शासकीय कर्मचा–यांना मुंबई वित्तीय नियम, 1959 मधील परिशिष्ट–26 मधील विहित नियम व खाली नमूद केलेल्या सुधारित अटींच्या अधीन राहून जुना फ्लॅट/जुनी खोली/जुने स्वतंत्र घर/जुना बंगला खरेदी करण्याच्या प्रयोजनासाठी पुढीलप्रमाणे घरबांधणी अग्रीम अनुज्ञेय राहील.

(1) अनुज्ञेय अग्रिमाची मर्यादा :–

मूल्यांकन करण्यास प्राधिकृत करण्यात आलेल्या व्यक्तींनी (Authorised Valuers) दिलेल्या प्रमाणपत्रामध्ये नमूद केलेली जुन्या घराची किंमत, किंवा संबंधित राज्य शासकीय कर्मचा–याला नवीन घर बांधण्यासाठी किंवा नवीन तयार घर खरेदी करण्यासाठी विद्यमान नियमानुसार जेवढा घरबांधणी अग्रीम अनुज्ञेय असेल त्या रकमेएवढा म्हणजेच मूळ वेतनाच्या 50 पट एवढी रक्कम, या दोन्ही रकमांपैकी जी रक्कम कमी असेल तेवढा घरबांधणी अग्रीम उपरोल्लेखित प्रयोजनासाठी अनुज्ञेय राहील.

तसेच वरील प्रयोजनासाठी घरबांधणी अग्रीम मंजूर करताना यापूर्वी निर्गमित करण्यात आलेल्या उपरोल्लेखित शासन निर्णय, दिनांक 6 नोव्हेंबर, 1990 मध्ये नमूद केलेल्या इतर सर्व अटी तशाच लागू राहतील.

सदर आदेश दिनांक 1 जुलै, 1995 पासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(अ.कृ.गोलतकर)
शासनाचे सह सचिव, वित्त विभाग.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)–1, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)–2, महाराष्ट्र, नागपूर,

रोटा/एच–452(14,000+10–7–95)

(कृ.मा.प.)

महालेखापाल (लेखा परीक्षा)-1, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव/उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग, विनिमय.

* पत्राद्वारे.

---

एच-452(14,000+10-7-95)